**ई-गव्हर्नन्स कार्यक्रमाअंतर्गत ऑन लाईनव्दारे ई-सेवा देण्यासाठी अर्थसंकल्पिय तरतुद करण्याबाबत -**

# महाराष्ट्र शासन

शासन निर्णय क्र.:मातंसं/नस्ती २०१०/प्र.क्र. ३४/३९
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २० एप्रिल, २०१०

वाचा :- १) योजना आयोगाचे अ.शा. पत्र क्रमांक एम ११०६/१०/२००३, दि. ७ ऑक्टोबर, २००३
२) संचालक,माहिती व संचार विभाग, केंद्र सरकार यांचे पत्र क्र. २(१५)/०९/इजी II, दि. १५.२.२०१०

**प्रस्तावना -**

योजना आयोगाच्या उपरोक्त संदर्भाधिन क्र. १ अन्वये प्रत्येक राज्याने एकुण वार्षिक योजनेच्या २ ते ३ टक्के एवढी तरतुद माहिती तंत्रज्ञान विषयासंबंधीच्या योजनांकरीता राखुन ठेवण्याच्या सूचना दिलेल्या आहेत. या अनुषंगाने केंद्र सरकारच्या कॅबिनेट सचिवांच्या अध्यक्षतेखाली उच्चाधिकार समितीनेसुध्दा यास संमती दिलेली आहे. या अनुषंगाने शासन मा.मुख्यमंत्री यांच्या मंजूरीने आता पुढिलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय -**

शासनाच्या प्रत्येक विभागाने व त्या अंतर्गत कार्यालयाने तसेच स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांच्या मार्फत जनतेस दिल्या जाणाऱ्या सेवा सुविधा माहिती तंत्रज्ञानाचा वापर करुन वेगाने, सुलभतेने व एकत्रित पध्दतीने, दर्जेदारपणे व कार्यक्षमतेने देण्यासाठी शासन कटीबध्द आहे. या अनुषंगाने प्रत्येक विभागाने वार्षिक योजनेचा प्रारुप आराखडा नियोजन विभागाला सादर करताना विभागाकरीता असलेल्या नियतव्ययापैकी (Planned Outlay) कमीत कमी १ टक्का एवढा नियतव्यय आपल्या विभागाशी संबंधीत ई-गव्हर्नन्स विषयक योजनांच्या अंमलबजावणीसाठी सन २०१०-११ या आर्थिक वर्षापासुन दरवर्षी राखुन ठेवण्यात यावा. शासनामार्फत जनतेला पुरविल्या जाणाऱ्या विविध सेवा ई-गव्हर्नन्सच्या माध्यमातुन पोहचविण्यासाठी अशा निधीचा खास उपयोग करणेबाबत सर्व प्रशासकीय विभागांनी कार्यवाही करावी. जेणेकरुन ग्रामीण जनतेच्या सामाजिक आणि आर्थिक परिवर्तनामध्ये या कार्यक्रमाचा महत्वाचा सहभाग राहिल.

२. सन २०१०-११ या वर्षाचे अर्थसंकल्प सादर केले आहे. तथापि, ज्या विभागाकडे अर्थसंकल्पित न झालेला नियतव्यय उपलब्ध आहे, त्यांनी पुरवणी मागणीव्दारे निधी अर्थसंकल्पित करुन त्यांच्या आस्थापना खर्चाच्या मुख्य लेखाशिर्षाखाली नवीन उपलेखाशिर्ष (ई-गव्हर्नन्सच्या नावाने) उघडून त्याखाली तरतूद करावी.

३. सदर निधी खर्च करताना सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. सिओएम १०९८/ प्र.क्र. २१२/९८/३९, दि. ५ ऑक्टोबर २००१ अन्वये संगणकीकरणाचा कृती कार्यक्रम राबविण्यासाठीच्या उच्चाधिकार समितीची किंवा सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रमांक सिओएम १००१/प्र.क्र. १७४/०१/३९, दि. २९.१०.२००१ अन्वये विभागा अंतर्गत स्थापन करण्यात आलेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीची प्रकल्पाच्या व्याप्तीप्रमाणे मान्यता घेण्यात यावी.

या शासन निर्णयाची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यांत आली असुन त्याचा संगणक संकेतांक २०१०००४२०१७३२३२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(डॉ. अजय भूषण पांडेय)**
**प्रधान सचिव (मा.तं)**

**प्रति,**

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्यसचिव यांचे खाजगी सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव,
सर्व विभागीय आयुक्त, /सर्व जिल्हाधिकारी,/ सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा) मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा) मुंबई,
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
सचिव,महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,(विधान परिषद /विधान सभा),मुंबई,
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
महालेखापाल-१ (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-१ (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
अधिदान व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई / लेखाकोष भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मुंबई
मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
निवड नस्ती (२ प्रती).